**पुणे येथील आंतरराष्ट्रीय क्रीडा विद्यापीठासाठी शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे येथील स्पोर्टस सायन्स सेंटर्सच्या इमारतीवर दोन अतिरिक्त मजल्यांचे बांधकाम करुन विद्यापीठासाठी वर्गखोल्या, कार्यालये इ.निर्माण करणे, तसेच, संकुलातील दोन वसतीगृहे व भोजनगृहाचे नुतनीकरण करण्यासाठी निधी मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आंक्रीवि-३५२१/प्र.क्र.२३४/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ससमा २०१०/प्र.क्र.४८ (भाग-१)/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८.
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २० सप्टेंबर, २०१९.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, अ.शा.प.क्र.आयएसयु-३५२१/सीआर.१६०/क्रीयुसे-१, दिनांक ८ जुलै, २०२१.
४) शासन पत्र क्र.राक्रीधो-२०२०/प्र.क्र.२३०/क्रीयुसे-१, दिनांक ५ जानेवरी, २०२१.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे क्र.आंराक्रीवि/बां.मं.प्रस्ताव/२०२१-२२/का.११/५७९, दिनांक २१ ऑक्टोबर, २०२१.
६) शासनाचे समक्रमांकाचे दिनांक १६ नोव्हेंबर, २०२१ चे पत्र.
७) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे क्र.आंराक्रीवि/नि.वि.प्रस्ताव/२०२१-२२/का.११/३४५, दिनांक २० जानेवारी, २०२२.
८) अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे यांचे जा.क्र.साबांमं/प्रशा/इमारती/१४१/सन २०२२, दिनांक ०६ जानेवारी, २०२२.
९) अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे यांचे जा.क्र.साबांमं/प्रशा/इमारती/२०३/सन २०२२, दिनांक १० जानेवारी, २०२२.
१०) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय,क्र.आंक्रीवि-३५२१/प्र.क्र.२३४/क्रीयुसे-१, दिनांक २५ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :-**

आंतरराष्ट्रीय क्रीडा विद्यापीठ, महाराष्ट्र, पुणे येथे स्थापना करण्यात आले आहे. विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेले बॅचलर इन स्पोर्टस सायन्स (बी.एस.एस.) आणि

बॅचलर इन स्पोर्टस मॅनेजमेंट (बी.एस.एम.) हे दोन अभ्यासक्रम सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षापासून या विद्यापीठात सुरु करण्यात येणार आहेत. विद्यापीठासाठी स्वतंत्र इमारत उपलब्ध होईपर्यंत, विद्यापीठ कार्यालय, कुलगुरुंचे कार्यालय, रजिस्टार व लेखाधिकारी यांचे कार्यालय, वर्गखोल्या, ग्रंथालय, स्टाफ रुम तसेच अनुषंगीक बाबीची व्यवस्था करणे आवश्यक आहे. सदर प्राथमिक सुविधा निर्माण करण्यासाठी शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे येथील स्पोर्टस सायन्स सेंटर्सच्या इमारतीवर दोन अतिरिक्त मजल्यांचे बांधकाम करण्यासाठी तसेच विद्यापीठातील विद्यार्थ्यांसाठी सध्याच्या कार्यान्वित दोन वसतीगृहांचे व भोजनगृहाचे नुतनीकरण करण्यासाठी रु. १७९६.७८ लक्षच्या खर्चास संदर्भ क्र.१० येथील दि.२५.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर बांधकाम व नुतनीकरणाच्या कामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आंतरराष्ट्रीय क्रीडा विद्यापीठ, महाराष्ट्र, पुणे साठी आवश्यक सुविधा उपलब्ध करण्यासाठी व विद्यापीठातील विद्यार्थ्यांना वसतीगृह, भोजनगृह इ. सुविधा उपलब्ध करण्याकरीता शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे या क्रीडा संकुलामधील स्पोर्टस सायन्स सेंटर्सच्या इमारतीवर दोन अतिरिक्त मजल्यांचे बांधकाम करण्यासाठी, सोबत जोडलेल्या परिशिष्ट-(अ) अनुसार रु.११४०.१० लक्ष तसेच संकुलातील दोन वसतीगृहे व भोजनगृहाचे नुतनीकरणासाठी सोबत जोडलेल्या परिशिष्ट- (ब) अनुसार रु.२७१.११ लक्ष याप्रमाणे एकूण रु.१४११.२० लक्ष (रु. चौदा कोटी, अकरा लक्ष, वीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयानुसार खर्चासाठी मंजूर केलेल्या रक्कमेचा विनियोग सोबत जोडलेल्या "परिशिष्ट-अ" व "परिशिष्ट-ब" मध्ये विहित केलेल्या बाबींवर, प्रचलित शासन कार्यपध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावा व खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३. सदर बाबींवरील खर्च “मागणी क.ई-३, २२०४- क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ (४१) आंतरराष्ट्रीय क्रीडा विद्यापीठ, (४१)(०१) आंतरराष्ट्री क्रीडा विद्यापीठ निर्माण करण्यासाठी सहाय्य

(कार्यक्रम), संगणक क्रमांक (२२०४-५८३१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याअंतर्गत चालू आर्थिक वर्षीसाठी मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. हे आदेश वित्त विभाग, अनौ.संदर्भ क्र.३४३/२०२२/व्यय-५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२८१८२२५४८४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2022.03.28 18:26:14 +05'30'

**सोबत: सहपत्रे.**

**( स्वा. म. नानल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
४. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
७. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
८. मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा / विधानपरिषद, यांचे स्वीय सहायक, मुंबई.
९. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे स्वीय सहाय्यक,

११. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
१२. अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
१३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१५. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१६. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे.
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१८. नियोजन विभाग (का-१४७१)/वित्त विभाग (व्यय-५, अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई
१९. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवड नस्ती (क्रीयुसे-१).

(शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.आंक्रीवि-३५२१/प्र.क्र.२३४/क्रीयुसे-१, दिनांक २८ मार्च, २०२२ सोबतचे सहपत्र)

## परिशिष्ट-अ

### अ) स्पोर्टस सायन्स सेंटर्सच्या इमारतीवर अतिरिक्त मजल्यांचे बांधकाम करणे-

| Name of Work :- Estimate for Proposed Extension of Sports Science Centre for Sports University at Balewadi Sports Complex, Pune | | | |
|---|---|---|---|
| RECAPITULATION SHEET | | | |
| Sr.No. | Description | | Cost in Rs. |
| A) | CIVIL WORK & PLUMBING WORK- | | |
| 1. | Sports University | | 9,65,57,597.13 |
| B) | **MATERIAL TESTING-** | | |
| 1. | Sports University | | 1,53,240.00 |
| **C)** | **ROYALTY CHARGES-** | | |
| **1.** | Sports University | | 3,41,994.46 |
| | | | |
| | **Total of (A+B+C) :-** | | **9,70,52,831.59** |
| | Add:- GST 12% | | 1,16,46,340.00 |
| | Add:- Insurance @ 0.5 % on (A) | | 4,82,788.00 |
| | Add:- Contingencies @ 5% on (A) | | 48,27,880.00 |
| | **Total Amount in Rs.** | | **11,40,09,839.59** |

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2022.03.28 18:26:35 +05'30'

(स्वा. म. नानल)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

(शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.आंक्रीवि-३५२१/प्र.क्र.२३४/क्रीयुसे-१, दिनांक २८ मार्च, २०२२ सोबतचे सहपत्र)

## परिशिष्ट-ब

## ब) शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळूंगे-बालेवाडी, पुणे येथील दोन वसतीगृहाच्या इमारती व भोजनगृह कक्षाचे नुतनीकरण करणे-

| | | | |
|---|---|---|---|
| Name of Work :- Estimate for Proposed Refurbishment of Hostel Bldg. "C", "D-1" & Mess for Sports University at Balewadi Sports Complex, Pune | | | |
| RECAPITULATION SHEET | | | |
| Sr.No. | Description | | Cost (Rs.) |
| Estimate as per PWD SSR **2021-22** | | | |
| A) | CIVIL WORK & PLUMBING WORK- | | |
| 1. | Refurbishment of Hostel Bldg."C", "D-1" & Mess of Shivchatrapati Sports Complex, Mhalunge-Balewadi,Pune. | | 2,29,66,459.16 |
| B) | **MATERIAL TESTING-** | | |
| 1. | Hostel Bldg."C", "D-1" & Mess | | 25,590.00 |
| **C)** | **ROYALTY CHARGES-** | | |
| **1.** | Hostel Bldg."C", "D-1" & Mess | | 85,894.71 |
| | **Total of (A+B+C) :-** | | **2,30,77,943.87** |
| | Add:- GST 12% | | 27,69,353.26 |
| | Add:- Insurance @ 0.5 % on (A) | | 1,14,832.30 |
| | Add:- Contingencies @ 5% on (A) | | 1148322.96 |
| | **Total Amount in Rs.** | | **2,71,10,452.00** |

| | |
|---|---|
| परिशिष्ट-(अ) एकूण रक्कम रु. | 11,40,09,839.59 |
| परिशिष्ट-(ब) एकूण रक्कम रु. | 2,71,10,452.00 |
| एकूण (अ+ब) - रु. | 14,11,20,291.59 |
| Rounding off to Rs. | 14,11,20,000.00 |

(अक्षरी रुपये चौदा कोटी, अकरा लक्ष, वीस हजार फक्त)

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2022.03.28 18:26:52 +05'30'

**( स्वा. म. नानल )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन